**बावनथडी प्रकल्पातून सोरणा मध्यम प्रकल्पात पाणी सोडण्याकरिता बावनथडी प्रकल्पाच्या उजवा कालव्याच्या १६५०० मी वरुन पूरक कालव्याचे विस्तार व सुधारणा अंतर्गत बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/ (प्र.क्र. ३६ /२०१७)/सिं.व्य.(कामे)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक: ०३/०८/२०१७

**वाचा :-** कार्यकारी संचालक,विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. जा.क्र./२४३/विपाविम/कातां-६(१)/सोरणा प्रमा ३६२/२०१६, दि. १०/१/२०१७.

**प्रस्तावना :-**

मोहाडी तालुक्यातील सोरणा मध्यम प्रकल्पाचे बांधकाम सन १९७१ मध्ये पूर्ण होऊन सदर प्रकल्प सिंचन व्यवस्थापन व देखभाल दुरूस्तीकरीता हस्तांतरीत झाला आहे.सदर प्रकल्प गोदावरी खोरे अंतर्गत पैनगंगा उपखोऱ्यात आहे. हा प्रकल्प मोहाडी तालुक्यातील जि. भंडारा सोरणा गावाजवळील स्थानिक नाल्यावर बांधण्यात आला आहे. सदर प्रकल्पाच्या माती धरणाची महत्तम उंची १४.३३ मीटर आहे. तसेच प्रकल्पास मुक्त प्रवाही बांधकामातील १०६.६८ मीटर लांबीचा सांडवा आहे. सोरणा एकूण साठा ६.१७२ दलघमी असून उपयुक्त साठा ५.७३३ दलघमी आहे. सिंचनाकरिता डावा कालवा ६.३० कि.मी. व उजवा कालवा ६.७७ कि.मी. आहे. या प्रकल्पाचे शेती योग्य क्षेत्र (CCA) १५५३ हे. व सिंचन योग्य क्षेत्र (ICA) ९३३ हे. असून १०९१ हे. करारनामा क्षेत्र आहे. बावनथडी मध्यम प्रकल्पातून पाणी सोरणा प्रकल्पात सोडण्यात यावा अशी मागणी विधानसभा सदस्य यांनी केली आहे. मागील १३ वर्षातील जलसाठयाचया आकडेवारीवरुन असे निदर्शनास येते की, सोरणा प्रकल्प फक्त ७५ टक्केच भरतो. प्रकल्प पुर्ण भरल्यास खरीप हंगामात १०९१ हेक्टर क्षेत्राला सिंचन होते सोरणा प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील लाभधारकांना खरीप पिकानंतर रब्बी/उन्हाळी पिके घेण्याकडे कल आहे. तसेच बावनथडी प्रकल्पाचे नियोजित लाभक्षेत्रात, शहरीकरण व औष्णिक वीज प्रकल्पमुळे ७८५ हे.सिंचन क्षेत्रात घट होत असल्याने बावनथडी प्रकल्पाच्या नियोजित पाणी वापरामध्ये २.२१ द.ल.घ.मी बचत होणार आहे. या पाणी बचतीतून सोरणा प्रकल्पास पाणी देणे शक्य असून या पाणी उपलब्धतेमुळे **सोरणा प्रकल्पाचे १३११ हे. सिंचित क्षेत्र जास्त क्षेत्र रब्बी/उन्हाळी सिंचनाखाली येईल** व त्यामुळे लाभधारकांच्या आर्थिक परिस्थितीत सुधारणा होईल. याअनुषंगाने सदर बावनथडी मध्यम प्रकल्पातून पाणी सोरणा प्रकल्पात सोडण्याच्या कामाकरीता विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, भंडारा जिल्हयाच्या मोहाडी तालुक्यातील सोरणा मध्यम प्रकल्प योजनेच्या बावनथडी मध्यम प्रकल्पातून पाणी सोरणा प्रकल्पात सोडण्याच्या विस्तार व सुधारणा अंतर्गत कामांसाठी रू. **१,४८,५१,४३८/-**, अनुषंगिक खर्च रू. **१४,८५,१४४.००/-** अशा एकूण रू. **१,६३,३६,५८२/-** (**रू. एकशे त्रेसष्ट लक्ष छत्तीस हजार पाचशे ब्याऐंशी फक्त** ) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि.१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनानुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.
२. प्रकल्पा वरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे; कामे पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे.
३. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने, दरसूचीबाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.
४. कालवा स्वच्छता व माती भरावाची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत. तथापि, यांत्रिकी संघटनेकडे मशिनरी उपलब्ध नसल्यास तसे प्रमाणपत्र यांत्रिकी संघटनेकडून प्राप्त करून घ्यावे.
५. सदर प्रस्तावित कामाकरिता लागणारी वन-जमिन वन विभागाकडून संपादीत केल्यानंतरच सदर कामाचे कार्यारंभ आदेश देण्यात यावे.
६. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.
७. सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च मागणी क्र.आय-५ ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्या वरील भांडवली खर्च, (११) विस्तार व सुधारणासाठी भाग भांडवली अंशदान (विदर्भ प्रदेश), (११) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १५८) या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/(प्र.क्र.३०/२०१३)/विनियम भाग-२, दि. १७.४.२०१५ मधील भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मध्ये विहित केलेल्या खर्चा बाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे विभागास प्राप्त अधिकाराच्या अनुषंगाने आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने नियोजन विभागाच्या **अनौपचारिक संदर्भ क्र. १११/ का १४३४ दि.२२/०५/२०१७**, आणि वित्त विभाग **अनौपचारिक संदर्भ**

**क्र११६ व्यय १२ दि१३/०६/२०१४** नुसार प्राप्त झालेल्या मान्यते नुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अनु क्र.३१ सन २०१७-१८ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०३१५५८०३३२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.08.03 15:50:36 +05'30'

**(सं.अ.टाटू )**
**शासनाचे उप सचिव**

सोबत :- परिशिष्ट-अ

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद,विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) प्रधानसचिव(जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) सचिव(जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
११) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१२) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
१३) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर ,
१४) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, नागपूर ,
१६) कार्यकारी अभियंता, बाघ इटिया डोट पाटबंधारे विभाग,गोंदिया,
१७) सिं.व्य. (कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०१७/ (प्र.क्र. ३६ /२०१७)/ सिं.व्य.(कामे), दि. ०३ /०८ /२०१७ चे सहपत्र.

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | कामाचा तपशिल | प्र.मा.रक्कम (रूपयात) |
|---|---|---|
| **१** | **२** | ३ |
| १ | सर्वेक्षणाच्या कामाकरिता | २२५१/- |
| २ | वन जमिन संपादनासाठी लागणारा खर्च | २३,१६,६००/- |
| ३ | पूरक कालव्या करिता लागणारा खर्च | १,१४,१४,९६७ |
| ४ | फिडर चनेल बांधकामाकरिता लागणारा खर्च | ११,१७,६२०/- |
| **५** | **एकूण** | **१,४८,५१,४३८/-** |
| **६** | **१० % अनुषंगिक खर्च** | **१,४८,५१,४३.८/-** |
| | **एकूण निव्वळ खर्च** | **१,६३,३६,५८१.८०**<br>say १,६३,३६,५८२/ |

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2d4c9d30f88b6a2745465552d33743e7c967f8c7a5d287520a1c61013a9d322a, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2017.08.03 15:50:52 +05'30'

**(सं.अ.टाटू)**
**शासनाचे उप सचिव**